**भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजनेंतर्गत सन २०२३-२४ मध्ये सर्वसाधारण प्रवर्गाचा रु. ५०००.०० लाख एवढा निधी कृषि आयुक्तालयास वितरीत करणेबाबत....२४०१A८८९**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. फुंफला-२०२३/प्र.क्र.१४३/९-अे,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : ०४ मार्च, २०२४

**संदर्भ:-**

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. राफयो-२०१८/प्र.क्र. ४७/९-अे, दि. ६.७.२०१८
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र. ४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र.फुंफला-२०२३/प्र.क्र.१४३/९-अे, दि.१४.०६.२०२३
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. फुंफला-२०२३/प्र.क्र.१८७/९-अे, दि.२१.०९.२०२३
५) संचालक (फलोत्पादन), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र. कृआ/फलो-२/भाफुंफलायो/२३-२४/४७८/२०२४, दिनांक ०३ जानेवारी, २०२४
६) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र.फुंफला-२०२३/प्र.क्र.१४३/९-अे, दि.०४.०१.२०२३

**प्रस्तावना :-**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत जे शेतकरी फळबाग लागवडीकरिता पात्र ठरु शकत नाहीत अशा शेतकऱ्यांसाठी राज्य शासनाने उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सुरु केली आहे. तसेच, संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयान्वये सदर योजनेत सुधारणा करण्यात आलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील परिपत्रकास अनुलक्षून भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सन २०२३-२४ मध्ये राबविण्यासाठी रु. १०४५०.०० लाख इतक्या निधीच्या कार्यक्रमास संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आता संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भ क्र. ५ येथील पत्रान्वये सन २०२३-२४ करिता सदर योजनेंतर्गत निधी वितरीत करण्याची विनंती केली होती. त्यास अनुलक्षून संदर्भ क्र.६ च्या शासन निर्णयान्वये सदर योजनेंतर्गत सर्वसाधारण प्रवर्गाचा २०००.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. आता भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजनेंतर्गत **सर्वसाधारण प्रवर्गाचा** निधी कृषि आयुक्तालयास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१) राज्यात भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड या योनजेची सन २०२३-२४ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी सर्वसाधारण प्रवर्गाचा रु. ५०००.०० लाख (रुपये पन्नास कोटी फक्त) इतका निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.
२) सदरचा निधी खालील लेखाशीर्षांतर्गत चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्र. डी-३
२४०१- पिक संवर्धन
११९, फलोत्पादन व भाजीपाला पिके,
(०१)(३३) भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना,
३३-अर्थसहाय्य, (२४०१ A८८९)

३) या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात आलेल्या रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४) या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन दिलेल्या निधीचा विनियोग चालू आर्थिक वर्षातील बाबींकरीता करण्यात यावा.

५) सदर योजनेची संदर्भ क्रमांक क्र.१ व संदर्भ क्र.४ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयातील तरतुदी तसेच वेळोवेळी केलेल्या सुधारणाच्या अनुषंगाने अंमलबजावणी करावी.

६) संचालक (फलोत्पादन) यांनी सदर योजनेच्या अंमलबजावणीबाबतचा आढावा वेळोवेळी घ्यावा व त्याबाबतचा अहवाल वेळोवेळी आयुक्त (कृषी) यांचेमार्फत शासनास सादर करावा.

७) सदर योजनेंतर्गत निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित अटी व शर्ती वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

८) वितरीत निधी तातडीने खर्च करावा व आहरित केलेला निधी बँक खात्यावर पडून राहणार नाही याची दक्षता घ्यावी.

९) प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.२६/का.१४३१, दिनांक १९.०१.२०२४ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.२१/२०२४/व्यय-१, दिनांक २२.०२.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३०४१६४६०३४२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

HEMANT GORAKHNATH MHAPANKAR

Digitally signed by HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=1775f5c28a439e88c4c15ab3f88d6a6beb26ad2675a8c7a7ff397b2e5305303d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6756123D309547BB1E152A6AEB6042BDE4040836DF541FD3620CA87FF8E71CC5, cn=HEMANT GORAKHNATH MHAPANKAR
Date: 2024.03.04 16:56:28 +05'30'

**( हे.गो. म्हापणकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (फलोत्पादन), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे खाजगी सचिव.
४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र राज्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) सर्व सन्माननीय विधानपरिषद / विधानसभा सदस्य, महाराष्ट्र राज्य.
६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) अपर मुख्य सचिव (कृषी व फलोत्पादन), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
८) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११) राज्यातील सर्व विभागीय कृषी सह संचालक.
१२) राज्यातील सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी.

१३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य.

१४) महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

१५) कक्ष अधिकारी, कार्यासन २अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई . ४०० ०३२.

१६) निवडनस्ती, कार्यासन ९-अे.

***********